# सुखद-संभ्रम



कोणता मानूं चंद्रमा ?—भूवरीचा कीं नभींचा ?

बघुनी सखिमुख वाटे हृदयीं
चंद्र कशाला भूवरि येई ?
बघतां गगनीं चंद्र तिथेंही !
वरिते मानस सुखद संभ्रमा !

गगनीं रजनी, भुवनीं रजनी
दिसतो चंद्रहि दोन्हि ठिकाणीं
एकावरि ये कलंक दिसुनी
दावि दुजा निज नयन—नीलिमा !

एक फुलवितो कमलविशेषा
दुजा फुलवि मम मानसकोषा
एक करितसे कीं तमनाशा
नाशी दुसरा मम विरह—तमा !

अमृत वर्षी एक स्वकरें
दुसरा पसरी पीयुष अधरें
एक अंबरीं प्रेमें विहरे
अंतःपुरिं दुजा वितरी प्रेमा !

संधिकाल जंव चुंबी एका
चढते लाली त्वरित तन्मुखा
दुज्यास अधरीं अधर जुळवितां
खुले कपोलीं प्रणय-रक्तिमा !

नभोमुकुरिं कीं सखी बघतसे
बिंब मुखाचें तिथें पडतसे
जननयनां तें चंद्र गमतसे
पसरि तेंच कां भुवनीं सुषमा ?

चंद्र कोणता वदन कोणतें ?
शशांक मुख कीं मुख शशांक तें ?
—निवडतील निवडोत जाणते !
मानी परि मन सुखद संभ्रमा !

# दैव

आकांड तांडव नभीं घनमंडळाचें
पाहोनी होउनि सहर्ष मयूर नाचे
आशा तदीय मनिं वर्षिल वारि तूर्ण
तो दुष्ट वात घनराजि करी विशीर्ण

व्योमीं दिसे धवलिया उगवे शशांक
पाहोनि मानि मनिं तुच्छ चकोर नाक
जीमूत तों पसरुनी गगनीं तमाला,
गंभीर नाद घनघोर करीत आला!

वृक्षांसि पल्लव लतांसि फुलें फुलांना–
सौगंध; गंधयुत वात, पिकांसि गाना–
देईल; हा ऋतु वसंत गमे वनांना
दावाग्नि तो भडकुनी करी दग्ध त्यांना!

ऐशापरी भुलवुनी जगतास दैव
आशेंत गोवुनि तया भ्रमवी सदैव
वाटे तयास निज इप्सित जो मिळेल
दुर्दैव दावित तदा स्वगती विलोल!

# प्रेमळ द्वैत

वद मी केविं तरी घननीळा!
तुजला पाहूं गोपाळा!
वनीं जनीं तुज गगनीं भुवनीं कोठें तरि पाहूं?
पाहूं कोठें? कोठें जाऊं?
कोणा तरि मी बाहूं?
जिकडे जातें तिकडे सगळें त्वन्मय जग झालें
मीच कृष्ण तो, कृष्ण तोच मी
द्वैत कुठेंही नुरलें!
कृष्ण अंतरीं तनु बाहेरी कृष्ण सखा खेळे
दिसे दृष्टिला कृष्ण, परी ते–
स्वतांच तन्मय डोळे!
कुणीं कुणाला कुठें बघावें, कोणाशीं बोलावें
बघणें वदणें कैसें व्हावें?
कोणीं हें सांगावें?
अद्वयरंगीं पुरी रंगली वृत्ती जगताची
ऐक्य परी हें काय म्हणुनिया–
माझ्या जीवा जाची?
प्रति रोमीं जरि देहिं कृष्णता हुरहुर मनिं वाटे
काय म्हणुनि ती? ऐक्य तत्त्व तें–
वाटे मज कां खोटें?
एकरूप सर्वत्र होउनी आत्मानंदीं गुंगावें

स्वतां डुलावें हंसावें परी—
काय त्यांत साधावें ?
प्रमोदकालीं दुजा न जवळीं मोद तरी फोल
निज आनंदीं दुजा रंगतो
मोद हो तरी सफल !
अद्वैतीं खरि मौज नसे ती प्रेमळ द्वैतीं जी वसते
प्रेमविनिमया द्वैत असावें
हेंच मनाला रुचतें !
नलिनीस्तव शशि गगनीं विलसे, शशिसाठीं नलिनी हांसे
शशि नच नलिनी, नलिनी नच शशि
प्रेम म्हणुनि त्यां गवसे !
सूर्य दिनमणी मेदिनि रमणी दोन जरी नसते
निशीथकालीं रविसाठीं ती—
मेदिनि मनिं कां झुरते ?
वस्तुयुगें जगिं अशींच दिसती प्रेमास्तव जगती मरती
अद्वैतें परि विलया जाती
प्रेमाचीं तीं नातीं !
भक्त देव जरि होति एक तरि भक्ति नुरे जगतीं
भक्त देव या द्वैतिंच भक्ति
भक्ति प्रभु तव महती !
देव मला तूं भक्त मी तुझा मी नलिनी तूं शशि माझा
सागर तूं सरिता मी, माझ्या
जीवांचा तूं राजा !
मेदिनि मी तूं सूर्य, मयूरी मी, तूं मोरहि असिस जरी

कृष्ण-मयूरा ! नाचुनि अभिनव
प्रीति-पिसारा पसरी !
तूंच असावें कृष्ण सुंदरा । मीही असावी तव राधा
मी हंसवावें तुवां हंसावें
चुंबुनि मुखारविंदा !
येई दयाळा । या वेलींतुनि कुसुमांतुनि कुंजांमधुनी
गगनांतुनि धरणींतुनि येई
माझ्या हृदयामधुनी !
येइ बैस या सुमनांवरती दोघेंही शोभूं जगतीं
सुमसुमनांवरि तूं, वेली मी—
वेलीवरती झुलती !
प्रेमें तुज लोचनीं बघावें प्रेमें तुजशिं रमावें
हीच आस मनिं, प्रेमासाठीं—
तुजशीं द्वैत करावें !
सोड सोड हा खेळ माधवा यांत नसे गोडी
उभय निराळे बसुनी उकलूं
प्रीति—भक्तिचीं कोडीं !

*   *   *

राधामाधव द्वैत म्हणुनि हें द्वैतें जगतीं वावरती
राधा-माधव-द्वैत नांदते
नांदे म्हणुनी जगती !

# गोंधळ

( या कवितेचें 'कोलंबिया' रेकॉर्ड घेतलेलें आहे. )

मांडिला महाराष्ट्रांत । गोंधळ
तुळजापुर हें मुळपीठ । निश्चळ
स्वातंत्र्य-देवता अंबा । मंगळ
गोंधळी मराठा गडी
दास्य-देहुडीं । गाइ गाणें
निज महाराष्ट्र—बोलीनें । उज्वळ !
येइ गे ! भवानी आई ! । गोंधळा
शिवनेरीच्या शिवबा ! ये । गोंधळा
तानाजी ! बाजी ! या हो ! । गोंधळा
निज सेनेसह रणधीर
भाउ ! मल्हार ! । भरारी ! या
या उदोकार गर्जाया । उदयाचा !
परदास्य-निशा चौफेर । पसरली
स्वातंत्र्य-भक्ति-दिवटी ही । उजळिली
कुळदैवत अंबाबाई । पूजिली
मांडिला गोंधळ स्वैर
कथा साचार । आयकावी
गत-वैभव-स्मृति जी देई । सकळिकां !
गेले राम, अयोध्या गेली । विलयाला !
स्मृति मात्र तयांची राही । आजला !
स्मृति दुःखद तरि ती व्हावी । स्मरणाला !

स्मृति दुःखद तरि ती होई
स्वभाव नराही । प्रकृतीचा
स्मरणीय पुन्हा स्मरण्याचा । सर्वथा !
गोकुळीं कृष्णभगवान । जन्मले
गोपिका-रुचिर-लावण्या । विकसलें
प्रेमाचे प्रेमल रंग । उधळिले !
तो नंदलाल रंगेल
खेळला खेळ । कौतुकाचे
हो स्मरण आजही त्यांचें । पावन !
शत कौरव पांडव राजे । गज-पुरीं
नांदले धरुनिया वैर । अंतरीं
झुंजले भयंकर झुंज । आसुरी !
झुंजले आसुरी झुंज
समर-मद-रंग । वीर त्याले
स्मृतिशेष परी ते झाले । सकलही !
शशिगुप्त, हर्षनृप, भोज । नांदले
यश-विभव भरतभूमीचें । वाढलें
वैखरी-ललितपद चपल तदा । नाचले
प्रासाद गगन चुंबिती
मतंगज झुलति । महाद्वारीं
नौबतिच्या झडती फैरी । गोपुरीं !
गातातिं साम-सन्मंत्र । ब्राह्मण

गर्जती यशोगुणगान । चारण
वर्णिती पराक्रम कवनीं । कविजन !
दुदुंभी गर्जती घोर
भेरि बंभोर । भरे गगनीं
प्रतिनाद तयाचा अजुनी । स्मरतसे !
पृथुराज सकल जगतांत । विख्यात
दावुनी शौर्य समरांत । अद्भुत
जलवलयांकित धरणीला । शासित
तें वैभव त्या कालिंचें
शौर्य समरिंचें । कोण साचें
वदुं शकेल अपुल्या वाचें । सकलही ?
बदलला काल तो थोर । जेधवां
रिपु घालिति घिरट्या स्वैर । तेधवां
संग्राम माजले घोर । तेधवां
लोपलें तदा स्वातंत्र्य
होई परतंत्र । देशसारा !
दैन्याचा सुटला वारा । चहुंकडे !
परदास्य-निशातम घोर । दुस्तर
सारुनी दूर चौफेर । सत्वर
उगवला जीवनाधार । भास्कर !
नवजीवन जगतीं भरे
तेज संचरे । दिशा दाहीं

ऐकिली मुक्तिची द्वाही । चहुंकडे !
शिवराय भूप भाग्याचा । भूवर
तळपला समर-मार्तंड । निर्भर
ध्वज रोवी स्वातंत्र्याचा । सुखकर !
सौभाग्य पुन्हा लाभलें
दिवस पातले । वैभवाचे
झळकती कळस सोन्याचे । मंदिरीं !
बावळा कांबळीवाला । मावळा
शूरांत शूर तो झाला । मावळा
दरडावी सुल्तानाला । मावळा
मावळा शूर सरदार
छाति भरदार । नजर करडी
फोडितो शत्रुची नरडी । संगरीं !
शिंद्यांची दिल्लित चाले । हुकमत
बंगाल रघुजी राजे । जिंकित
पेशवे रोविती झेंडा । अटकेंत
चहुंकडुनी चढला थेट
मऱ्हाटी थाट । भारताला
साम्राज्य चढे कळसाला । तेधवां !
क्षय पुण्याईचा झाला । अवचित
उगवला सूर्य मावळला । अवचित
ध्वज उभारिला कोसळला । अवचित

परदास्य–घूक ओरडे
वीज कडकडे । अवनतीची
पसरली रात्र काळाची । भेसुर !
पुण्याचा संचय होता । जोंवर
उत्कर्ष होय राष्ट्राचा । तोंवर
उलटली घडी दैवाची । नंतर
तें स्मरण कशाला अतां ?
संपली कथा । वैभवाची
गेलेल्या स्वातंत्र्याची । सुखकर !
भूतकाल वैभवशाली । लाभला
पुढलाही ये भाग्याचा । त्याजला
नियम हा हृदयिं ठेवावा । चांगला
आपदा नसे शाश्वत
साह्य भगवंत । दुर्बळाला—
कर्तव्यपरा धीराला । निश्चयें !
उदयोस्तु वदा अंबेचा । उदयोस्तु !
उदयोस्तु वदा शिवबाचा ! उदयोस्तु !
उदयोस्तु समर–गाजींचा । उदयोस्तु !
उदयोस्तु जन्मभूमिचा
वदा महाराष्ट्र–दौलतीचा
गेलेल्या स्वातंत्र्याचा । उदयोस्तु !

# शशिकला



(शरदृऋतूच्या वद्यपक्षांतील उत्तर रात्रीं दिसणाऱ्या क्षीण शशिकलेस उद्देशून ही कविता लिहिली आहे.)

हे शारदीय शशिकले !
काय जाहलें ?
सांग बाले ?
कोणतें संकट आलें ?
तव अमृत-निस्यंनिदी—
चारु हासिनी !
कांति लपुनी
येई कां म्लानता वदनीं ?
यामिनी सखी सोडुनी
जासि येथुनि
कुठें विजनीं ?
दीनता पसरुनी गगनीं !
कां जलद धरिली ही चाल ?
जिवाचे हाल
कशाला करिसी ?
तनुलता व्यर्थ शिणविसी !
ज्योत्स्नेचा तव श्रृंगार

विफल होणार
म्हणुनि साचार
दुःखी कां मनिं तूं फार ?
वंचि कां तुला साजणी—
प्रीति लावुनी
कुणी भुवनीं ?
वद हृदय मोकळें करुनी !
ह्या बारा सोळा जणी
चांदण्या गगनिं
चोंहि कडुनी
बाहति तुज लपुनी छपुनी !
वाटतें कुणी तरि येत
गगन-भवनांत
थोर श्रीमंत
बघ तुझा असे कां कांत ?
होइ कां हृदय शंकित—
इथें एकांत
नसे म्हणुनी ?
परि खेद करि न तूं स्वमनीं !
चांदण्या खऱ्या नव्हत कीं
गगन-मंचकीं
मोगऱ्यांचीं

विधि घाली शेज ही साची !
या शेजेचा उपभोग
घ्यावया योग्य
कोण तुजवीण ?
हें थोर भाग्य तव जाण !
करि सफल अतां शृंगार
विलसुनी स्वैर
सारुनी दूर—
संदेह मनांतिल सर्व !
रात्रींचा चवथा प्रहर
फार सुखकर
शांत गंभीर
शोभवो तुझा शृंगार !
होतसे सृष्टि ही शांत
पवन हा शांत
गगनही शांत
लाभण्या तुला एकांत !
परि हाय ! काय जाहले ?
तुला शशिकले !
दुःख कसलें ?
पुनरपि तव मुख कां सुकलें ?
ह्या पहा दिशा उजळती !

रंग उधळिती
प्रीतिचे गगनीं
सन्मानिति त्या तव स्वामी !
बघ तुझा हृदय—नायक—
उभा सन्मुख
राहि येवोनी.
तुजसाठिं आतुर स्वमनीं !
ज्यासाठिं देह सजविला
नभीं उगवला
तुझा तो नाथ
फिरवी न अतां निजमुख !
परि दिनीं दिनमणी येत
उघड मिरवीत
जरी डौलांत
दिनिं कैंचा मग एकांत !
हा पडला चाळा यास
रोज हृदयास
लावुनी आस
दिन उजाडल्यावरि येत ।
विरहाच्या रात्री किती—
सोसिल्या असति—
तुवां या जगतीं !
क्षिति यास नसे परि त्याची !

तव दर्शन दे निःशंक—
जगाला सौख्य,
परी एक—
हो चक्रवाक विरहार्त !
म्हणुनि कीं तुला दुःखद
शाप दे विहग
धरुनि मनिं राग
‘ लाभो न तुला पति संग ’ !
कुणि शाप म्हणो वा कांहिं
मनीं परि येइ
सांगतों खचित
हा पति न तुला शोभत !
तूं असती किति सुकुमार
किती हा प्रखर
उग्र वदनीं
बघवे न त्याकडे नयनीं !
जन कांहींही बोलोत !
परी मज गमत
हा न तव नाथ
पर पुरुष कुणी तरि येत !
म्हणुनिया मनीं लाजुनी
वदन झांकुनी
जासि वेगानें
स्त्रीजातिसहज—विनयानें !

# शाम

[ सुप्रसिद्ध कवि श्री. आनंदराव कृष्णाजी टेकाडे यांच्या संगीत ‘ मथुरा ’ नाटकांतील एका पदांतील मूळ कल्पना व धृपद जसेचें तसें घेऊन ही कविता लिहिली आहे. ]

‘ आराम जो मनाचा
तो शाम राधिकेचा ? ’
चैतन्य चेतनाचें
मांगल्य मंगलाचें
आनंद योगियांचा
तो शाम राधिकेचा !
सौजन्य सज्जनांचें
नाविन्य नूतनाचें
गुण जो गुणीजनांचा
तो शाम राधिकेचा
सौंदर्य चारुतेचें
माधुर्य माधुरीचें
शृंगार साजिऱ्याचा
तो शाम राधिकेचा !
सौभाग्य कीं सुखाचें
जो गोप-गोपिकांचें
गोपाल गोधनाचा
तो शाम राधिकेचा !

वसुदेव देवकीचा
सुत लाडका गुणाचा
श्रीरंग रुक्मिणीचा
तो शाम राधिकेचा !

व्रजसुंदरी जनांतें
लावी अनन्य नातें
अनुराग अंतरींचा
तो शाम राधिकेचा !

विध्वंस कंसरिपुचा
कीं काल कालियाचा
जो राम रावणाचा
तो शाम राधिकेचा !

भक्तांसि देव दिसतो
दुष्टां कृतांत गमतो
जो भाव भावनेचा
तो शाम राधिकेचा !

कविराज—कल्पनेचा—
लीला विलास साचा;
रसरंग वाग्वधूचा
तो शाम राधिकेचा !

# कांहीं कळेना



मेघ गर्जेना !
पाणी बरसेना !
कैसें रान हिरवें राही ?
कांहीं कळेना !
आकाशाच्या शेतामध्यें
कुणीतरि पेरी मोत्यें !
पीक चांदण्यांचें येतें !
कैसें कळेना !
आकाशाच्या उद्यानांत
कुणी लावी दिव्य वेली !
चंद्र-सूर्य-फुलें आलीं !
वेली दिसेना !
काय अभिनव झालें !
बाग नभीं जे फुलले—
रातोरात सुकुनी गेले !
कैसे कळेना !
तेजोनिधि भास्कर तो
सोळाकळीं प्रकाशतो !
काळोखानें काळा होतो !
कैसा कळेना !

आकाशींच्या माळरानीं
गर्जे बादल बरसे पाणी
तेजें भरे मंदाकिनी !
पाणी राहिना !

हांसे दामिनि मेघ बघुनि ती
हंसतां माणिक मोतीं झडती !
पाउस त्याला कोणी म्हणती !
कैसें कळेना !

सृष्टि–सुंदरीचें लेणें
आकाशींचे चांदी सोनें !
कोण घडवि हे दागिने ?
कांहीं कळेना !

भाव अंतरीं उठती !
शब्द वाचेंतुनी येती !
भाव शब्दांची संगती—
कैसी कळेना !

# तान्हें बाळ



राजाच्या राणीला
        पूर्ण झाले मास
        मूल ये जन्मास
अभिनव !
साजिरें गोजिरें
        मूल कौतुकाचें
        जणूं चिद्वल्लीचें—
फुललें फूल !
आकाश—गंगेचें
        तेजोमय पाणी
        घालोनिया न्हाणी—
बाळ, माता !
काजळ नयनीं
        तिमिराचें घाली
        बाळा कुरवाळी
माय प्रेमें !
लागतसे भूक
        करी तें आकांत
        जेवाया घालीत—
माता तेव्हां !

चंद्रिकेचें दुग्ध
चांदण्यांचा भात
कालवोनी खात
तान्हुला तो !
जेवाया चांदीचें—
ताट शशांकाचें
रवि कनकाचें—
जल–पात्र !
तेजोमय पाणी
बाळाला पिण्याचें
काय भोजनाचें—
वैभव हें ?
ध्रुवावरी दोन्ही
दोऱ्या अयनांच्या
बांधोनी; काळाचा—
केला दोला !
अर्ध्या आकाशाचा
घातला बिछाना
पहुडला तान्हा
पाळण्यांत !
अर्ध्या आकाशाचें
घाली पांघरूण

बाळाला गाऊन
निजवी माता !
अनंत काळाची
झोंप तान्हुल्याची
त्याला निजण्याची—
मोठी गोडी !
पाळण्याचा झोंका
चाले निरंतर
त्याला स्थित्यंतर
नाहीं ठावें !
युगापाठीं युगें—
जाती, तरि तान्हा
ऐसा बाळराणा
नाहीं दुजा !

# मुरलीमाधुरी

मुरली रम्य वाजली ! मधुरता विकासली !
भूवरी, अंबरीं, माधुरी निनादली !
दिगंतरीं तरंगली !
मधुरता विकासली !
मृदु निनाद ऐकतां
उपजली प्रसन्नता
गोकुलीं, हर्षली, सकलजनमनावली !
अनंतरंगिं रंगली !
मधुरता विकासली !
तरु निकुंज डोलती
विहंग गानिं गुंगती
अलितती, गुंजती, मंदपवन संगतीं !
तरंग रंगती जलीं !
मधुरता विकासली !
गोप गोप–सुंदरी
नाचती परोपरी
माधुरी, ती खरी, मूर्तिमंत उतरली !
स्वर्गिंची धरातली !
मधुरता विकासली !
फेर धरित वसुमती
दश दिशाहि नाचती
नाचती, बिलगती, वस्तु सकल संप्रती !

स्वपर वृत्ति विसरली !
मधुरता विकासली !
गान गगनिं पाझरे
जगति शांति संचरे
शांतता, तरलता, रमति एक अवसरें !
भिन्नता विभागली !
मधुरता विकासली !
मोद नाद चहुंकडे
नादिं मोद सांपडे
लोपतां, विषमता, एकताच एकली !
अनेकता निवर्तली !
मधुरता विकासली !
सृष्टि सकळ रविं मुरे
रवचि एकला उरे
मुरलितें, ऐकतें, कोण कुठुनि केंवि तें !
वर्णितां न ये मुळीं !
मधुरता विकासली !
राधिका मुखांतली
हरि–मुखास लागली
ओतुनी, निःस्वनीं, तीच मधुरता जनीं !
दीनता दुभंगली !
मधुरता विकासली !

# विनवणी



सोड सख्या श्रीहरी ! झडकरी
सोडुनिया निज नाथ पहा ही
सरलि दुरी शर्वरी—झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

जागि उषा—सुंदरी। जाहली
रवि—नयना उघडितां सृष्टिची
झोंप ओसरे पुरी। झडकरी!
सोड सख्या श्रीहरी !

गलबल करिती किती ! पांखरें
झोपाळू जगतास सुचविती
सोड शयन संप्रती। झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

कमलिनिसह रंगुनी। यामिनीं
बघ आनंदें भृंग उडाले
मृदुदल—पाशांतुनी। झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

असाचि जरि वाटतो। रहावा
गळ्या भंवतिचा पाश करांचा
सोड सोड सत्वरीं। झडकरी
सोड सख्या श्रीहरी।

विचार करि अंतरीं । लवभरीं
मी अबला मज बाहुपाश तव
कसा सुटावा तरी ?। झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

तुटली आलिंगनीं । अडकुनी
गळ्यांतली वनमाळ तुझ्या ती—
घ्यावयास गुंफुनी । झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

रात्रभरीं खेळुनी । तुजसवें
माझा जो शृंगार भंगला—
सजवाया तो तरी । झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

ऐक एवढी तरी । विनवणी
काय वडिल म्हणतील अंतरीं
लाज तयांची धरी । झडकरी
सोड सख्या श्रीहरी !

# जिव्हाळा

कोणा कोमलांगी साठीं ?
        वृत्ति झाली वेडी पिशी
जिवा लाविला जिव्हाळा
        कोण ऐसी ही वेल्हाळा ?
रात्रंदिन तळमळ
        मन करी हळहळ !

कधीं पाहिली नसुनी
        वेध कैसा लागे मनीं ?
नाहीं देखिली सुंदरी
        तरी वाटते अंतरीं
मजसवें निरंतर
        हिंडे फिरे जगीं स्वैर !

उठे–बसे, हाले–डोले
        परी दिसेना नच बोले !
भासे परी नच दिसे
        कैसें लावियलें पिसें ?
क्षणीं वाटे गवसली
        परी भूल समजों आली
आतुरता वाढे फार
        झालें व्याकुळ अंतर !

प्रियेवीण परदेसी—
        झालों, आतां गती कैसी ?
जीव करी तगमग
        जाळी विरहाची आग !
हृदयाचें ढळे ठाण
        नाहीं मना समाधान !

चित्त जाहलें उदास
        नाहीं जीविताची आस !
पंचप्राण होती गोळा
        कधीं पाहीन ती बाळा ?
लळा लागलासे मना
        कधीं पुरेल कामना ?
राही येउनी सुंदरी !
        माझ्या हृदय—मंदिरीं
बैस प्रेमाच्या पर्यंकीं
        मुळीं मानूं नको खंती
मऊ मृदुतेची शेज
        सेवी सोडुनिया लाज
श्रृंगारिलें अंतरंग
        भोग—साहित्य अभंग !

न कळत तुजविषीं
        प्रीती उपजे मानसीं

दिसंदिस बळावली
    प्रेमग्रंथी दृढ झाली
तुजवीण अन्य नारी
    नाहीं मानिली अंतरीं
नको करूं अनमान
    मज द्यावया दर्शन !

कशासाठीं काय घडे !
    तुझे ठायीं चित्त जडे !
योगापूर्वीच मजला
    तुझा वियोग घडला !
तुझ्या स्मरणानें सुख
    तुझ्या वियोगानें दुःख !
सुखदुःख एक झाले
    हर्ष शोक मिसळले !
नयनीं अश्रुपूर लोटे
    हृदयीं आनंद लगटे !
एक नाहीं एक वेळ
    सर्व वृत्तींचा कल्लोळ !

जीव तुझ्या जीवीं गुंते
    माझी मज माया तुटे !
माझें कांहींच उरेना
    तूंच देहींची चेतना !

धरूं कैसें तुझें ध्यान
        नाहीं स्वाधीन स्मरण !
डोळां कैसें पाहूं तुज
        दृष्टी नुरे माझी मज !

ऐसें कैसें तुझें रूप
        बघणें राही आपोआप।
मन बघाया आतुर
        बघणें राही निरंतर !
ऐसी द्विधा स्थिती झाली
        सोसवेना मला मुळीं !
बघावेंसें वाटे गडे !
        तुझें सगुण रूपडें !

प्रेमरंगीं रंगलें
        मन प्रेममय झालें !
अंतर्बाही प्रेम थाटे
        प्रेम त्रिभुवनीं दाटे
प्रेम प्रेमाचा बडिवार
        प्रेमीं द्वैताचा संहार
तुझ्या शिवीं माझ्या जीवें
        मिळोनिया प्रेमभावें
अर्धनारी–नटेश्वर
        ऐसा करावा संसार

जीवा वाटे व्हावें ऐसें
        कधीं भेटसी राजसे ?

बहु दुःखांचे डोंगर
        कोसळले शिरावर !
आधि—व्याधींची जाचणी
        देह झाला काष्ठावाणी !
प्राण होती कासावीस
        वाटे जगणें सायास !

एका तुझ्या प्रीतीसाठीं
        सर्व सोसिल्या ह्या गोष्टी
नाहीं मरणाची भीती
        तुझी झाली जरी भेटी
तुझी भेट होतां गडे !
        धरिन काळाशीं वांकडें !
एवढीच विनवणी
        भेट एकदां साजणी

# निःश्वास



नाहीं पाहत मी नभा तुजकडे, पाहूं कशाला तरी ?
माझी आवडती तिथें न दिसते तारा तुझ्याभीतरी !
येती तारक ते असंख्य उदया अस्तासही पावती
अस्तानें नच दुःख, सौख्य उदयें त्यांच्या मला संप्रती !

धाडोनी मधुगंध व्यर्थ मजला बोलाविसी कासया ?—
उद्याना ! नच मन्मनीं तिळ गमे उल्हास कीं यावया !
पुष्पांनीं फुलल्या जरी बहरल्या जाई जुई शेवती
माझ्या आवडत्या लतेविण नसे आराम चित्ताप्रती !

नाहीं मी भुलणार चारुतरही गंगे ! तरंगां तव
माझें आधिंच लोभलें मन जिच्या लीलातरंगां नव—
ती माझी सरिता निदाघसमयीं शुष्कोदका जाहली
माझी वृत्ति तरी तिच्यासम अतां कीं शुष्कता पावली !

आनंदें उडती वनीं विहरती वृक्षांवरी बैसती
गाती मंजुल निःस्वनीं हरिखुनी पक्षी प्रभातीं किती !
तें पाहोनिहि ऐकुनी हृदयिंच्या दुःखा कसा आवरूं ?
नाहीं त्या विहगांत संप्रति अहा ! तें लाडकें पांखरूं !

प्रीतीचा सुकला गुलाब; सुटती वारे सुगंधाविणें
गेला चंद्र लयाप्रती मग कसें राहील तें चांदणें ?
कांटेरी झुडुपास पुष्पलतिका मानूनि आलिंगणें !
भाळूंच्या रडण्यास गान गणुनी आयुष्य हें कंठणें !

# दीप-निर्वाण



ती दीप--ज्योति मालवलि। चहुंकडे उदासता भरलि!

निःस्नेह हृदय होई तें
उल्हास कोठला त्यांतें?
सत्प्रकाश पसरायातें
नैराश्य—निशा संचरलि!

स्नेहाचा उजळे दीप
घे पतंग त्यावरि झेंप
जीवांत जीव समरूप!
भीती न मृत्युची उरलि!

ज्योतिचें तेज कज्जलही
सारखेंच शलभा होई
प्रिय दोषहि प्रेमाठायीं!
कज्जलेंच कांती खुललि!

आवडती दीपशिखा ती
आवडती पसरी कांती
कज्जलही आवडतें कीं
प्रेमांत नावडी नुरलि!

प्रीतीची फुलली वेली
आवडतीं पुष्पें आलीं
प्रीतिनेंच तीं हुंगियलीं
प्रीतिला अमर जरि सुकलि!

आवडती बोले मैना
आवडत्या घेई ताना
आवडती अंतःकरणा
एकेक राहि मनिं ठसलि !

आवडता नाचे मोर
त्याकडेच वारंवार
वाटतें बघावें स्वैर
नाचतें चित्त त्याजवळि !

आवडती तारा चमके
तिजपुढें सूर्यचंद्रहि ते
निस्तेज वाटती ममते
ढळते न दृष्टि तिजवरालि !

वाटतें नवल लोकांतें
कां शलभ भुले ज्योतीतें ?
नच लौकिक नातें–गोतें
भिन्नता कशानें जुळलि ?

चंद्रकोर आकाशींची
कमलिनी कुसुमं जातीची
उभयीं नच समता साची
शशि बघुनि नलिनि तरि हंसलि !

नच मानि प्रीति कुलगोत्र
सौंदर्य न लक्ष्मीपुत्र
मंगल प्रीति सर्वत्र
प्रीतींत विषमता कसलि ?

भिन्न वस्तु भिन्नावृत्ती
एकत्र सकलही होती
एकल्या प्रीतिनें जगतीं !
प्रेमांत चमत्कृति असलि !

ज्या दीपशिखेवरि होती
निःसीम प्रीति शलभाची
मालवल्यावरि ती अंतीं
मग त्यास मरणगति रुचलि !

प्रीतीच्या मूर्तीकरितां
जीवाचि तुटावी ममता
प्रीतिची न तरि सार्थकता
प्रीतिनें प्रीति जगिं जगलि !

# उषा

उगवत्या प्रहरीं
ही कोणी उभी नारी
        राहिली उदयगिरीशिखरीं ?
तनुवरी सारी
नवतीची भरदारी
        बहरली नयनमनोहारी
        उगवत्या प्रहरीं !

*        *        *        *

क्षण बघे सरल
क्षणि तरल नयनयुगुल
        क्षणीं गंभीर वदनकमल !
क्षणांतचि हांसे
क्षणि मुग्धपणें विलसे
        क्षणीं मग चंचलचित्त दिसे !
उल्लसित चित्त
उल्लासित करि जगत
        भरे उल्लास अंबरांत !
नवल परि वाटे
जरि मोद जगीं दाटे
        दृश्य ये दृष्टिस उफराटे !

नभोवनिं फुलल्या
तेजोरसिं रसरसल्या
चांदण्या कलिका कां चिमल्या !
हिच्या वेणींतलीं—
सुमनें जीं सुकलीं
गळुनि आकाशीं कीं पडलीं !
दिव्य परि सुमनें
त्यांना कुठलें सुकणें ?
निरंतर शोभति दिव्य गुणें !
गमे परि चित्तीं
दिव्य तीं जरी, करि ती—
म्लान त्यां हिची रूपदीप्ती !
दीप्ति ती सारी
पसरली गगनभरी
पसरुनी सारी ध्वांत दुरी !
उगवल्या प्रहरीं !

*     *     *     *

पूर्वदिक्प्रांतीं
आरक्त रंग उठती
नाकळे कोठुनि ते येती ?
काय तदंतरिंचा
अनुराग रंग साचा
उसळला पडला दृष्टिपथा ?

प्रभातीं नारी
उतरुनिया गगन—सरीं
　　　　जेधवां मंगलस्नान करी—
गतनिशीं भरिला
करतलीं चरणयुगलां
　　　　रंग तो कीं धुतला गेला !
लाल जल होई
तेंच कीं नयनीं येई !
　　　　कल्पना वाटे चुकली ही !
गगन—भूवरतीं
आरक्त चरणकांती
　　　　उमटली गमे चालतां ती !
कुंकुमाचा हा
सिंचिते रमणि किंवा
　　　　नभः प्रांगणीं सडा बरवा !
कशास्तव नारी—
ही खटपट करि सारी ?
　　　　रंगवी सगळा उदयगिरी !
　　　　उगवत्या प्रहरीं !

+　　*　　*　　*

कालची रजनी
झोंपल्या जगावरुनी
　　　　उलटली नाहिं पुरी अजुनी—

तरी कां घाई
इज आज अशी होई ?
        कोणता विचार मनिं येई ?
ना कळे कांहीं
स्वच्छंद उभी राही
        लोचनीं कवणातें पाही ?
काय येणार
कुणि कुलीन सरदार
        उघडुनी स्वर्गाचें द्वार ?
म्हणुनि कां नजर
भिडवुनी एकतार
        पाहते ही वारंवार ?
आनंदें भारीं
तन्मानस—कासारीं
        उसळती लहरीवरि लहरी
        उगवत्या प्रहरीं !

*   *   *   *

स्वागतासाठीं
कोणाच्या तरि युवती—
        होतसे उत्कंठित चित्तीं ?
काय तो आला
सरदार मनीं भरला ?
        खचित कां तो इजला दिसला ?

हें नये वदतां
परि पहा रमणि—चित्ता
    येइ लज्जायुत चंचलता !
देह बेताल
मुख होइ लाल लाल
    लाल लोचनहि गाल लाल !
जीव बावरला
हृदयांत धीर नुरला
    बंध कटिबंधाचा सुटला !
प्रभापट चुकुनी
धरिला जरि सांवरुनी
    सरकला तरि स्कंधावरुनी !
अहा ! त्या समयीं
उजळल्या दिशा दाही
    उजळलें विश्व सकळ पाही !
धन्य उदयगिरी
धन्य ती उषानारी
    जाहली धन्य सृष्टि सारी !
    उगवत्या प्रहरीं !

# फूल फुललें !



फूल फुललें
अलि गुंगले—
सुगंधानें; थकलेले सारे जीव निवाले !

दीप लागले
तेज फांकलें
तिमिरानें त्रासलेले सारे पतंग उडाले !

मेघ बोळले
वारि वर्षले
नाच नाचाया सुखानें सारे मोर मिळाले !

शीत निमालें
आम्र बहरले
गाती गाणें वसंताला सारे कोकिल सुरेले !

# वेणुगीत

मंजुळ मंजूळ
 वेणु वाजवि गोपाळ
मंजुळवि सृष्टि सारी
 नंद यशोदेचा बाळ !

गळां शोभे वनमाळा
 वनमाळी तो सांवळा—
कोंवळ्या अधरांनीं
 वेणु वाजवि मंजूळा !

मुरलीचा ध्वनी
 चाले मंजुळ मंजूळ
निर्मळ यमुनेचे
 वाहे जळ झुळ झूळ !

मुरलीचा ध्वनी
 चाले मंजुळ मंजूळ
फुलल्या सुमनांचा
 दाट भरे परिमळ !

वेलींचीं पानें
 हलति हळु हळुं वायूनें
मुरलीचें गाणें
 चाले मंजुळवाणें !

गाई आल्या जलपानीं
अस्त झाला दिनमणी
ध्वनि चाले मुरलीचा
दीप लागले गगनीं !

उभी अवकाशाच्या द्वारीं
निशा गोपिका नारी
उजळोनि चंद्रज्योति
ओंवाळिला मुरारी !

झगमग चंद्रिकेंत
वाजे मंजुळ मुरली
बहरली विश्ववल्ली
पुष्पें प्रकाशाचीं आलीं !

चंद्र आला माथ्यावरी
झाली तारकांची दाटी
रंगलें वेणु-मीत
गीतमय झाली सृष्टी !

गगनींच्या गंगेकांठीं
चांदण्या मारिती उड्या
यमुनेच्या वाळवंटीं
सुर खेळती फुगड्या !

वात वाहे मंदमंद
धरि मुरलिचा छंद
ध्वनि निघे अनिर्बंध
कृष्ण गोविंद गोविंद !

*    ✻    *

मंजूळ मंजूळ
वेणु वाजवितो कान्हा
मंजुळवी सृष्टी सारी
नंद यशोदेचा तान्हा !

बाई ! माझ्या कानावरी
सूर आला बांसरीचा
लागला तीर अंतरीं
जसा फुलल्या फुलाचा !

ऐसा बाई ! अपरात्रीं
वाजे पावा माधवाचा
नीज निमाली आंधळी
उघडे डोळा जागृतीचा !

मंजुळ मंजूळ
मनिं उठति कल्लोळ
त्या मंजुळतेनें
जीव जाहला विव्हळ !

मंजुळ मंजूळ
        मनिं भरला नाद
हृदयांतुनि येती—
        मंजुळ पडसाद !
मंजुळ मंजूळ
        रव अतीव मंजूळ
मंजुळल्या वृत्ती
        मंजुळला अहंभाव !
ध्वनि बाई ! मुरलीचा
        आला कानावरि माझे
एकाएकी मंदिराचे
        उघडले दरवाजे !
रव श्रवणीं आला
        जीव ऐकुनी निवाला
रव जीव पडली मिठी
        मार्ग सुलभ जहाला !
आनंदलें दिसे वन
        आनंदलें त्रिभुवन
अवघा आनंद आनंद
        ध्वनि आनंद निधान !
ध्वनि बाई ! मुरलीचा
        देहभरी माझ्या दाटे
झाली मुरली देहाची
        जीव वासुदेव वाटे !

ध्वनि संतत चाले
ध्वनिला न अंतपार
अंतपार अंतरला
आला अनंताला पूर !

* * * *

अनंत वाजवित
मुरलि ते अनंत
अनंतगुण गीत
निघे अनंत सुरांत !
अनंतगुण गीत
निघे मुरलींतुनी
अनंत परि तींत
उरति संगीत ध्वनि !
उरलेल्या ध्वनिमाजीं
उरे गूढ संगीताचें
स्फुरलें जें ध्वनिगीत
गाई गुणवंत वाचें
मंजुळ मंजूळ
वेणु वाजवि गोपाळ
मंजुळवी सृष्टि सारी
नंदयशोदेचा बाळ !

# फाग



चला ग चला ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

तिमिराचा काळा काळा
जमवुनी रंग सगळा

पिचकारी रविवरी मारूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

संध्येच्या सौंदर्याचा
साजिरा रंग सोन्याचा

त्यानेंच सृष्टि सजवूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

रमणींचा गोरा गोरा
घेउनी वर्ण सारा

चंद्रास त्यांत न्हाणूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

वायुच्या तरल लहरींनीं
धरुनी चांदणी चांदणी

चंद्रिका तिजवरी उडवूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

अवकाशामधुनी
अष्टदिशांच्या वदनीं

स्वर्गंगा–जल झोकूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

फुलत्या पुष्पांचा
पुष्पवर्ण फुलता फुलता

तो वसंतावरी फेकूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

अरुणाची लाली
मिसळुनि तेजाच्या सलिलीं

विश्वांत रंग उधळूं ग
प्रीतिनें फाग खेळूं ग !

# वाऱ्याचे भारे



वायूच्या वाड्यामधें
लाविल्या लक्ष वाती
विझणाऱ्या उजेडांत
आंधारा आली भरती!
निर्वात आवारांत
एकला दिवा जळे
नित्याच्या प्रकाशांत
आंधारें केलें काळें!

*　　*　　*　　*

वाळूच्या देऊळांत
मांडिला महादेव
ढासळत्या डोल्हाऱ्यांत
देवाचें नुरलें नांव!
निश्चल नगावरी
नांदतो निरंजन
नांव चिरंतन चाले
येइ विनाशा मरण

*　　*　　*　　*

आकाशांत उभारिल्या
कल्पनेच्या इमारती
कल्पना विरतां, विरती—
करुनि निराशा पुरती!

अष्टदिशा—स्तंभांवरी
अवकाशाची इमारत
निरालंब राहे उभी
निराकार भंवतीं भिंत !

*      *      *      *

काल—ताल—तरू—पत्रीं
लिहिला इतिहास
भडके आग कल्पांताची
इतिहास जळला तींत !
काल—ताल—तरू—शिरीं
उभा चिरकाल कधींचा
कल्पांताच्या पुढें चाले
इतिहास संतताचा

*      *      *      *

वाहत्या प्रवाहावरी
रेखिलें रम्य चित्र
पळणाऱ्या पाण्यासवें
चित्र पळालें परत्र !
दिव्य  दिगंबरावरीं
अनंत वर्णांकित
चित्र असे चितारिलें
चित्रस्वरूप अनंत !

# वंचिता

उदास हा मधुमास माधवा! तुजविण गमतो रे!
जीवा चैन नसे मम मन प्यालें वारें! ॥ धृ० ॥

बहर नवा हा सुमलतिकांचा नवी चंद्रिका ही
नवी नवाई नव्या वयाची व्यर्थ आज पाही!

तळमळतो मम जीव जिवलगा! पाण्याविण मासा
दीपाविण वा तडफडणारा पतंग कीं जैसा!

धरुनि भरंवसा तुझा अजवरी बेत बहू केले
हौस मनींची मनीं राहिली, सुख आतां सरलें!

अजवरि होता आनंदाचा शिशिर शैशवाचा
मुग्धपणींच्या मुग्ध मनाच्या मुग्ध विलासाचा!

नव्हती आशा संयोगाची, हुरहुर नव्हती ही
नव्हति जाचणी प्रिय विरहाच्या दुःखाची हृदयीं!

नव्हते दिन दुःखाचे, नव्हत्या उदासल्या रजनी
नव्हते लोचन मदनविकारी नव्हती प्रीति मनीं!

परि हा आला उन्मादक मधुमास यौवनाचा
नवीन आशा नव्य निराशा घेउनि नवलाचा!

* * * *

तारुण्याच्या मधुर वसंतश्रीचा कोकिल तूं
प्रेमपंचमीं त्वां गावें हा मनांतला हेतू!

येइ सख्या ! मन्मानस–सरिंच्या सरस राजहंसा !
या जीवाच्या जवाहिराची करीन तुज भूषा !
कुठवर ठेवूं धीर राजसा ! चित्त अधिर झालें
प्रथम लावुनी प्रीति अतां कां मन निष्ठुर केलें !
प्रथम मीलनीं लोभ लावुनी लाविलेंस नादीं
परि मायावी प्रीति तुझी ही कळलें नच आधीं !
प्रेम करावें प्राणांतावरि परि तें पाळावें
सागरसरितासंगमनातें चित्तिं वागवावें !
वंचुं नको रे सजणा ! तुजवरि जीवित हें उरलें
तुझ्याचसाठीं गणगोताला अवघ्या मी मुकलें !
करुनि विनवणी थकला माझा हिरमुसला जीव
दावि एकदां मला मुकुंदा ! तव मुख–राजीव !

# प्रयाण

गेलें पृथ्वीवरलें दाणापाणी सरुन !
तुटले सारे पाश आतां
नुरलें एकहि बंधन
सरला पसारा परता
टाकिलें अवगुंठन !
पिंजरा मोकळा झाला
पांखरूं वेगें उडालें
घे भरारी अवकाशीं
चिन्मय चिंव चिंव बोले !
भंगला भंगूर दीप
मालवे लागली ज्योत
तेज मिसळे तिमिराच्या—
पैलच्या सत्प्रकाशांत !
भाजनीं कोंडिला वायु
निसटुनी वाहतो स्वैर
नुरवि कांहीं रितें कोठें
करि भरल्यांत संचार !
मृत्युचा मार्ग चालोनी
लंघुनी प्रांत सान्ताचा
अनंतत्त्वीं अनंताच्या
सरे संसार जीवाचा !

# एकाएकीं !



उल्हासानें परोपरी नटली ग !
माझ्या जीवाची हौस नाहिं फिटली !

नवनवतेची पहाट झाली
नवभावाची उषा उदेली
नव आशा नवरंगीं नटली

एकाएकीं लाली कशी विटली ग !
माझ्या जिवाची हौस नाहिं फिटली !

अंगणांतला चंपक तरुवर
विकसत होतें फूल तयावर
आषक ज्याच्या मन गंधावर

एकाएकीं कळी कशी चिमली ग !
माझ्या जीवाचि हौस नाहिं फिटली !

मनोरथांचा तुडुंब सागर
उत्साहाची भरती त्यावर
जाइन गमलें परतीरावर

एकाएकीं नाव कशी फुटली ग !
माझ्या जीवाचि हौस नाहिं फिटली !

कीं असुखाच्या कूपामधुनी
प्रसन्नतेनें वरती चढुनी
बसेन वाटे सुख–सिंहासनीं

एकाएकीं दोरी कशी तुटली ग !
माझ्या जीवाचि हौस नाहिं फिटली !

हृदयाच्या दिवठाणावरती
लावियली आशेची ज्योति
पसरित होती भंवती कांती

एकाएकीं हवा कशी सुटली ग !
माझ्या जीवाचि हौस नाहिं फिटली !

# पराप्रीति

जडलि तुझी माझी प्रीत
सरली तगमग मनाची
नुरे आस आणीकाची

दिसे प्रेमाचिये दिठीं
आटोकाट रूप तुझें
भान आणिकाचें बुजे !

अळि करी भृंग ध्यान
होई भृंगची आपण
एकरूप ध्याता ध्यान !

झालें तुझें माझें तसें
चित्त चिंतन सरिसें
भेद तुझा माझा नसे !

एक देखणें नयनीं
एक बोल दों वदनीं
एक भाव दोघा मनीं !

मिळतिं सिंधु वैतरणी
एक ओघ एक पाणी
एकजीव तैसें तूं मी !

तुझी माझी प्रीतिलता
बहरली देठोदेठीं
तुझ्यामाझ्यामय सृष्टी !

खालीं वरी अंतराळीं
आणि तुझ्यामाझ्यामधें
आतां तूं मी असूं दोघें !

# उडोनीया गेला हंस !



अशुभ ही निशा बाई !
जीवा लागे हुरहूर
शेजारी ग गेला दूर !

जीवींच्या जिव्हाळ्यानं
खोपा केला ग मऊ
पारवा कोठें पाहूं ?

मानसाच्या आसपास
मोत्यांची ग केली रास
उडोनिया गेला हंस !

वेली वेलीवरी केली
फुलाफुलांची आरास
संपला ग मधुमास !

प्रीतिभरें उफाळत
हृदयीं ग रत्नाकर
मावळली ग चंद्राकोर !

आवडीनें आंगणांत
लावियला सोन चांफा
सुकला तो लागुनि वाफा !

# काळरजनी

भरला भयाण सागर
पसरली रात्र घोर
कशी जाउं पैलपार ?

ओसाड ग भंवताल
झालें मानस चंचल
कसा सांवरूं ग तोल ?

निःस्नेह न जळे दीप
मिटति नेत्र आपोआप
आंधारांत उभें पाप !

घाली अंतरंग साद
मुळिं नुठे पडसाद
विरती वायुवरी शब्द !

जीवा लागली झुरणी
नीज नये ग लोचनीं
कशि कंठुं काळ रजनी !

# हुर हूर



दुरुनि कानिं येई रव कसला हा बाई !

रजनीचा दाट तिमिर
झाला अजुनी न दूर
विश्वाचें पिहित दार
घोर अशा समयीं—!

प्राची हंसली न अजुनि
गेला उडुगण न पळुनि
निद्रावश सर्व अवनि
मूढ दिशा दाही !

ग्लानी जिकडे तिकडे
ग्लानींतचि जीव दडे
वपुचें निर्माल्य पडे
चैतन्य नुरे कांहीं

शून्याचें वरि अनंत
विरलें शून्यांत जगत
शून्य समयिं परि सांप्रत
गीत कोण गाई !

रव कोमल जों उमटे
ग्लानी सगळी निवटे
खडबडुनी जीव उठे
उल्हास भरे ह्रदयीं !

ललित तान ललित गीत
अंतरंग मुदित करित
मुग्ध ह्रदय-कोष खुलत
कोण करी नवलाई !

स्वरतरंग हिंदोलीं
आंदोलनिं मति रमली
रव जीवहि वर खालीं
डुलत झुलत राही !

न कळों रव ये कुठुनी
न दिसो गाणार नयनिं
येवो चिर गान श्रवणिं
आस हीच ह्रदयीं !

संसृतिचे भंवति पाश
करितिल संगीत नाश
आशंका ही मनास
हुर हूर परि लावी !

# प्रतीक्षा



किति रे किती सख्या !
किती फिरूं आडरानीं
भडकल्या वारूवाणी ?

कुठें तुज शोधूं आतां ?
भ्रमलें रे माझें मन
तुला शोधुन शोधुन !

तुझ्या स्वैरपणासाठीं
गेलें पांखरांच्या पाठीं
आस धरूनीया पोटीं !

साऱ्या अवकाशामधें
उजळिल्या ज्योती ज्योती
तुझी पहावया मूर्ति !

आठवूनि तुझे गुण
केलें तदाकार मन
परि नसे समाधान !

हृदयाच्या द्वारीं उभा—
जीव, तुझी वाट पाहे
दृष्टि वाटेकडे राहे !

# प्रभात

संपली न नीज काय? संपली निशा ही!
आळवीत सतत तुला जीव शिणुनि जाई!
जीवनांतली पहाट
अपुल्या ही आज होत
साधुनि घडि घेइ त्वरित
काल करी घाई!
उदयोन्मुख विश्वदशा
अंतरिं तव कंवि निशा?
आशेची उदित उषा
हृदयीं मम होई!
येई हा समय रुचिर
होइल अपणास उशिर
ठेवुं नको मिटुनि नेत्र
सावध झणिं होई!
झालें बघ दार खुलें
दिव्य, अनंतामधलें
तेज दिव्य ओघळलें
अमितांतुनि कांहीं!
घेऊं घडि ही साधुनि
हृदयिं हृदय न्याहाळुनि
दोघेंही एकपणीं
आस दुजी नाहीं!

# भूपाळी

उदया ये, उदया ये झडकरि भगवन्नारायणा !
मंगलमय तव उदयासाठीं तळमळ लागे मना !
मोहमयी निद्रेंत गुंगवी अखिला जी काळी—
दुर्भाग्याची दीर्घ तमिस्रा ती संपत आली !
ओसरला अंधार निशेचा अरुणतेज फांकलें
फुलली मग जिकडे तिकडे तीं प्रसन्नतेचीं फुलें !
प्रसन्न झाल्या दिशा, उमललें प्रसन्नतेनें नभ
प्रसन्नतेनें विश्व उमललें, प्रसन्नता ही शुभ !
विश्वाची उमलती घेउनी कळा सवें मारुत
जीवा जीवावरि लीलेनें जाई उधळीत !
जीवाजीवांचे मिटलेले भाव—कोष उमलले
निद्रावृत्त चैतन्यहि आंतिल खडबडुनी जागलें !
चिन्मंगल सौरभें दाटल्या सकल जीव—वृत्ती
सकल मंगलायतनदर्शना नयन मात्र झुरती !
तुझ्या दर्शनीं तृप्त व्हावया उत्कंठित सृष्टी
तव उदयाचीं स्तोत्रें गाया भाट वाट बघती !
तुझ्या स्वागता उदात्ततेचीं गुंफियलीं तोरणें
मनोरंगणीं सद्भावजलें केलीं संमार्जनें !
विनम्र होउनि उभे ठाकले आतुर जीव पुढें
देहांच्या देवडिवरि झडती हृदयांचे चौघडे !
मंगलोदयें होवो मंगल सकलांचें आतां
मंगलप्रभास्नानें लाभो नित्य निरामयता !

# सकाळचा चंद्र

प्रभातींचा चंद्र हा कळाहीन
सुचवि चित्तीं कल्पना नवनवीन–
सूर्यतेजें निस्तेज होय फार
जेंवि निष्प्रभ हो पराभूत वीर !

असे किंवा हा तपोभ्रष्ट योगी,
त्यजुनि संसारा होय कुणि विरागी;
विगतवैभव कीं कुणि असे नरेंद्र,
अनादरित असा काय कुणी कवींद्र ?

लोकनायक दुःशील दुराचारी,
असे किंवा सौंदर्य व्यभिचारी;
जरठतरुणीचा प्रणय होय खास
बघुनि वाटे निस्तेज या शशीस !

प्रीतिभग्नाचें मुखावरिल हास्य,
काय मेलेल्या मनाचा विलास ?
बाल–विधवेचें वदन करुण जैसें
गमे मजला हें चंद्रबिंब तैसें !

फूल वेलीवर वाळलें अकालीं
वाळल्या कीं वेलीस कळी आली;
आइवांचुनि लेंकरूं जसें दीन
गमे तैसें चंद्रास या बघून !

# नंदादीप

मालवूं नको रे !
जीवें भावें उजळीला देवघरीं नंदादीप !

मंद जरी तेज त्याचें
दाखवी तें रूप तुझें
एवढ्याचसाठीं जीव घुटमळे त्या समीप !

ज्योत अखंड तेवते
नको फुंक मारूं तीतें
नाहीं तरी दृष्टीवरी तम घालील झडप !

वारा जरी झेंप घाली
झांकिन ती पदराखालीं
माझ्या जीवनाची झाली विश्रांती जी अमूप !

तिमिरानें झांकळली—
दृष्टि तेजें प्रक्षाळली
तुझ्या वैभवाचीं झालीं दर्शनें जागोजाग !

कोंदाटलें अभ्यंतरीं—
तेज वोसंडे बाहेरी
विश्वांतील काळींबेरीं प्रकाशमय सारीं होत !

ज्योतीनें या चेतविली
जीव ज्योती पुंजाळली
जीवनाची निशा काळी तेजामधें विरुनी जात !

ज्योतीवरी लावुनी या
ज्योती नेतिल आयाबाया
अशानेंच होइल राया ! सर्व ज्योतीमय जगत !

# नको मारूं मला हांक !

आडमार्गावरी, रात्रीं
खिंडारांत वा उजाड
लपोनीया भिंती आड–
सांदी-सांबटींत उभा–
राहोनीया आंधारांत
नको मारूं मला हांक !

एकलीच मी घरांत
नाहीं दिवा वा सोबती
दाटतसे मनीं भीती !
धड धड हृदयांत
भरे अंगांत कांपरें
जीव सारखा घाबरे !

कंठ होतसे कोरडा
बोल नये मुखावाटे
प्रत्युत्तर देऊं कैसें ?
नको ऐसी हांक मारूं
नको येऊं भलत्या वेळीं
भलत्या वाटें, भलत्या स्थळीं !

तुझ्या प्रीतीची ही अशी--

रीत मुलखावेगळीं;
मी तर बाई ! साधी भोळी !

यावें जरी तुला वाटे

घेउनिया ये प्रकाश
होइल भीतीचा निरास !

येशि तरी उगा ये रे !

नको व्यर्थ मारू हांकां
नको जागे करू लोकां !

# वाढवेळ

किति वाढवेळ जाहली ?
ही मध्यरात्र काजळी
मी तशांतही एकली
किती तुझी वाट पाहिली !

येशील भरंवसा म्हणुनी
ठेविलें दार उघडुनी
रंगलें तुझ्या चिंतनीं
पळ घटका मोजित मनीं

तव मदनमूर्ति सांवळी
मम नेत्रबिंबिं बिंबली
कां आजच दूरावली ?
कां अशी दैवगती फिरली !

कशि झाली ताटातूट ?
कां उगीच पडली फूट ?
नच करिसि पुन्हां कां जूट ?
कां उगाच धरिसी हट ?

हृदयासि हृदय लागलें
रोमांच दोहिं थाटले
गहिंवरें कंठ दाटले
आठवती क्षण ते भले !

आधि कां चटक लाविली ?
कां अतां उपेक्षा केली ?
रीत ही काय चांगली ?
तरुनेंच लता कीं त्यजिली !

आंधार भंवतीं हा अतां
करि भयाण बघ जीविता
उबगले वाट पाहतां
कठिण रे! प्रीतिची व्यथा !

हें जिणें मज न कंठवें
नच आशेवरी राहवें
किति कथूं तुजसी आर्जवें ?
नच एकटेपण सोसवें !

# तुझ्या संगतींत

आखुडल्या रात्री
दीर्घ झाले दिन
तुझ्या संगतीनं !

तापद शीतळ
निर्गंध गंधित
तुझ्या संगतींत !

दूरा जवळीक
दुःखा आराणूक
तुझ्या संगतींत !

जग सभोंवार
राहिलें निमूट
तुझ्या संगतींत !

तम होइ लीन
प्रकाश–किरणीं
तुझ्या संमीलनीं

न्यून तें संपूर्ण
अभंग हो; भग्न–
तुझ्या संगतीनं !

वियोगीं चिंतिलें
संयोग–संगीत
नटलें प्रत्यक्ष !

तुझ्या संगतींत !

# संदेश

नका बोलूं बोल
माझा सुटलासे तोल
बोलापाठीं मोल उभें
अबोला अमोल !

नका घालूं वारा
मला होतसे उबारा
नका शिंपु पाणी, आग--
लागली शरीरा !

नका हांसू मला
माझा दाटलासे गळा
आसपास आसवांचा
बहरला मळा !

नका होऊं आड
अतां उघडिलें कवाड
टक लागे बाहेरची
दृष्टिच्या पल्याड !

नका दावूं वाट
अतां रिघालें मोकाट
नको देव घेव नको–
जन्मवरी हाट !

नका करुं उपदेश
मज भरला आवेश
पाय मागें न परते
ऐकिला संदेश !

*

# माय उणें लेंकरू



हें कदा न हांसे मायउणें लेंकरू !

पहिलीच उमलली प्रीतिलतेची कळी
क्षणमात्र लाभली मायेची साउली
परि तोंच आपदा घोर शिरीं पातली
वाळतां लता कलिकेस केंवि सांवरू !

किति द्यावे खाऊ गोड, रिझविण्यास त्या
आनंदवावया किति गावें गीता
परि थांबे ना तें क्षणही आक्रंदता
दिसतां न गाय हंबरे जिवें वासरु !

कळवळुनी घेती आयाबाया तया
समजाविति दाउनि परोपरीनें दया
परि माय कोठली त्यांत दिसावी तया
बघतसें भंवति भिर भीर दीन कोंकरू !

कावरी बावरी क्षणांत फिरते वरी
पाहुनी तयाची विकल दृष्टि घाबरी
भडभडुनी दुःखें दाटति कढ अंतरीं
जाईल उडुनि कां नभांत फुलपांखरू ?

# दीपकलिका



दिवेलावणीची जाहलीसे वेळ
उजळिली दीपकलिका अळुमाळ !

चिमुकला दीप चिमुकली ज्योत
बीज प्रकाशाचें होई अंकुरीत !

मंद सभोंवती शृंगारली कांति
मंद मंद चित्तीं उमटली शांति !

आज आयुष्याची जाहली दिवाळी
जळोनी तमाची हो राखरांगोळी !

आपुल्या जीवनी पर्वकाळ ह्याच
प्रकाशांत पाहूं रूपें आपुलींच !

रूपाचें कैवल्य सदासर्वकाळ
पहातां पहातां डोळिया सुकाळ !

हारपली निशा, सुखें दाटे जीव
आपुल्या हृदयीं आपुली राणीव !

आपुले आपण गाऊं आतां गीत
दीपकलिकेच्या शांत प्रकाशांत !

# शुद्धिपत्र.



[ शुद्धिपत्रांत जे मुद्रणदोष अर्थहानि करणारे किंवा छंदोदोष उत्पन्न करणारे आहेत तेवढेच दिले आहेत. ]

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १६ | ७ | भाव | भावि |
| २१ | ५ | धवलिया | धवलिमा |
| २६ | ५ | लावण्या | लावण्य |
| ४८ | ५ | अनमान | अनुमान |
| ५७ | ५ | चरणयुगलां | चरणयुगुलां |
| ६२ | १५ | वेणु–मीत | वेणुगीत |
| ७० | २ | मम | ( मम न हो ) |
| ७० | १६ | नव्य | नव्या |
| ७७ | ५ | खोपा केला ग मऊ | खोपा ग केला मऊ |
| ७७ | १५ | मावळली ग चंद्रकोर | मावळली चंद्रकोर |
| ८३ | १२ | निद्रावृत्त | निद्रावृत |
| ९० | १२ | एकटेपण | एकटपण |

# परिशिष्ट १.

## कवितांच्या चाली, वृत्तें, किंवा राग व लेखनकाल यांचें सूचीपत्र

| पृष्ठ | कविता | चाल, वृत्त किंवा राग | लेखनकाल |
|---|---|---|---|
| १ | निवेदन | अभंग | ३-१२-३१ |
| ३ | प्रभाती | राग-भैरवी | ७-७-१६ |
| ५ | नवल | 'प्रणयतरंगासवें' राग-धानी दादरा | ३-१-१७ |
| ७ | भ्रमरास | 'अर्धतनू वारुळी' | २९-१-१८ |
| ९ | शोभा | राग-धानी | २२-६-१९ |
| १० | चंद्रावरील कलंक | 'चंद्रकांत राजाची' | ८-१०-१९ |
| १२ | प्रेम प्रेमा अनुगामी | 'आनंदी आनंद गडे' | १७-८-२० |
| १५ | भाविकाल | 'प्रणयतरंगांसवें' | १२-२-२० |
| १७ | गूढ | 'हृदयविदारक वार्ता श्रवणीं' | २२-९-२० |
| १९ | सुखद-संभ्रम | 'मज गमे ऐसा जनक तो' | २०-१०-२१ |
| २१ | दैव | वसंततिलका | २४-१२-२१ |
| २२ | प्रेमळ द्वैत | 'सबसे रामभजन कर लेना' | १६-२-२२ |
| २५ | गोंधळ | 'तुम्हि दान द्यावें चोखट गा। पांडुरंगा' | १७-५-२२ |
| ३० | शशिकला | 'जरि नाहिं कमल तें करी' | १२-१०-२२ |
| ३५ | शाम | 'माषूक हो बगल् में' | २९-१-२३ |
| ३७ | कांहीं कळे ना ! | 'आंबा पिकतो रस गळतो' | २७-६-२३ |
| ३९ | तान्हें बाळ | अभंग राग-पिलू | २३-७-२३ |
| ४२ | मुरलीमाधुरी | 'प्रणयतरंगांसवें' | २९-८-२३ |
| ४४ | विनवणी | 'रामकृष्ण नरहरे स्वामिन्' | २८-११-२३ |
| ४६ | जिव्हाळा | अभंग | २१-१२-२३ |
| ५१ | निःश्वास | शार्दूल विक्रीडित | ९-१-२४ |
| ५२ | दीपनिर्वाण | 'ही एक आस मनिं उरलि' | १०-३-२४ |